**सार्वत्रिक विधानसभा निवडणूक - २०१९ च्या बंदोबस्ताकरीता प्रासांगिक करारावर घेतलेल्या राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसच्या भाड्यापोटी देय रु.९,६८,४३,७०८/- इतकी रक्कम अदा करण्याच्या प्रस्तावास मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.- संकीर्ण ०८२०/प्र.क्र.७३/विशा १ अ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०४ सप्टेंबर, २०२०.

<u>संदर्भ</u> :- विशेष पोलीस महानिरीक्षक ( प्रशासन ), महाराष्ट्र राज्य पोलीस मुख्यालय यांचे क्र.पोमसं/३०/वाह.अधि/सार्वत्रिक वि.स.नि.-२०१९/३०/२०२०, दिनांक ०५.०८.२०२० चे पत्र

**<u>प्रस्तावना :-</u>**

सार्वत्रिक विधानसभा निवडणूक-२०१९ करिता राज्यातील सर्वच पोलीस घटक यांनी कायदा व सुव्यवस्था राखण्याच्या अनुषंगाने बंदोबस्ताकरीता प्रासंगिक करारावर घेतलेल्या राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसच्या रु.९,६८,४३,७०८/- (अक्षरी रुपये नऊ कोटी अडुसष्ट लाख त्रेचाळीस हजार सातशे आठ फक्त) इतक्या भाडेखर्चास वित्तीय वर्ष २०२०-२०२१ साठी विहित लेखाशिर्षाखालील शिल्लक अनुदानातून मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

सार्वत्रिक विधानसभा निवडणूक-२०१९ करिता राज्यातील सर्वच पोलीस घटक यांनी कायदा व सुव्यवस्था राखण्याच्या अनुषंगाने बंदोबस्ताकरीता प्रासंगिक करारावर घेतलेल्या राज्य परिवहन महामंडळाच्या बसेसच्या रु.९,६८,४३,७०८/- (अक्षरी रुपये नऊ कोटी अडुसष्ट लाख त्रेचाळीस हजार सातशे आठ फक्त) इतका भाडेखर्च अदा करण्याच्या प्रस्तावास मंजूरी देण्यात येत आहे.

सदरचा खर्च मागणी क्र. " बी-१, २०५५, पोलीस (००) १०९, जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस बल, दत्तमत (२०५५०१६८) ५०- इतर खर्च " या लेखाशीर्षाखाली सन २०२०-२१ या वित्तीय वर्षातील उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा. तसेच कार्यालय अधिक्षक, पोलीस महासंचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय वित्तिय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग - १ मधील अनुक्रमांक ६, नियम - ४० अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या पूर्ण अधिकारात व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२७३/२०/व्यय-७, दिनांक २५.०८.२०२० अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००९०४१४०२४५१३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shirish Nagorao Mohod

Digitally signed by Shirish Nagorao Mohod
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66fda7e745bb4928b21046cecbf7bd8f40e4950e0a99497fa2862e1d37ed75b7, serialNumber=beb4df218cab93811ed9522b6f8ac2546899b499eb80512bfa5ec939466fb620, cn=Shirish Nagorao Mohod
Date: 2020.09.04 16:29:22 +05'30'

**( शिरीष मोहोड )**
उप सचिव, गृह विभाग

**प्रति,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. महालेखापाल- २ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
३. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
४. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. निवडनस्ती.